५

२०१४०८२११५२४३४७४२३

**महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत केलेल्या रक्कमेतून मराठवाडा विकास कार्यक्रमाअंतर्गत उस्मानाबाद जिल्ह्यातील हातलादेवी मंदिर परिसर विकास कामांना प्रशासकीय मान्यता व खर्च करण्यास परवानगी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक टीडीसी २००९/४/प्र.क्र.१२० /पर्यटन,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक - ०३/११/२००९.**

**सदंर्भ : जिल्हाधिकारी, उस्मानाबाद, पत्र क्र. नियोजन/का-५/मविका/पर्यटन/प्र.मा/२००९-१०/९२०, दिनांक २३/०८/२००९**

**शासन निर्णय :** पर्यटनस्थळांच्या ठिकाणी पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत मार्च २००९ च्या अधिवेशनात रुपये २६७२.०० लाख व जून २००९ च्या अधिवेशनात रु. ५७७८.०० लाख मिळून रु. ८४५०.०० लाख इतकी तरतूद सन २००९-१० साठी अर्थसंकल्पित झाली आहे.

सन २००९-१० मध्ये प्रादेशिक पर्यटन विकास अंतर्गत अंर्थसंकल्पित झालेल्या रुपये ८४५०.०० लाख निधीतून जिल्ह्यांमधील पर्यटन स्थळांच्या ठिकाणी विकास कामांना प्रशासकीय मान्यता देऊन रु. ५९१०.०० लाख इतका निधी संबंधित जिल्हाधिकारी यांना शासन निर्णय टीडीसी २००९/७/प्र.क्र.१५५ /पर्यटन, दिनांक १३ ऑगष्ट २००९ अन्वये मंजूरी दिली आहे व उर्वरित रक्कम रुपये २५४०.०० लाख महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत करण्यास शासन निर्णय समक्रमांक दिनांक १३ ऑगष्ट २००९ अन्वये मंजूरी दिली आहे. या निधीत मराठवाडा विकास कार्यक्रम अंतर्गत विकास कामांना उस्मानाबाद जिल्ह्यासाठी रु. १५०.०० लाख इतक्या रक्कमेचा समावेश आहे. त्यामुळे रु. २५४०.०० लाख इतक्या रक्कमेच्या निधीतून मौजे हातलादेवी, जिल्हा उस्मानाबाद येथील मंदिर परिसर विकासासाठी रु. १०१.३३ लाख इतकी रक्कम वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये शासन मंजूरी देत आहे.

**(रुपये : लाखात)**

| अ. क्र. | स्थळांचे व कामांचे नांव | अंदाजित रक्कम | वितरीत रक्कम | कार्यान्वित यंत्रणा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | **मौजे हातलादेवी मंदिर, उस्मानाबाद** | | | |
| १. | प्रवेशद्वार तयार करणे | १.४२ | १.४२ | उप विभागीय वन अधिकारी, उस्मानाबाद |
| २. | पुरुष व महिलांसाठी स्वच्छतागृह बांधणे | २.७७ | २.७७ | |
| ३. | मंदिरापर्यंत जाण्यासाठी पदपाथ तयार करणे | २.९६ | २.९६ | |
| ४. | हातलादेवी मंदिर परिसर सुशोभिकरण करणे घाटाची दुरुस्ती करणे. | २.४२ | २.४२ | |
| ५. | हातलादेवी मंदिर, सुशोभिकरण करणे सलग समतल दगडी बांध (सि.सि.बी) पूर्व बाजू, टेकडी सभोवताली, पश्चिम बाजू | २२.७८ | २२.७८ | |
| ६. | नळ पाणी पुरवठा करणे, पंपीग मशीनरी, जी.आर.क्षमता २ लक्ष हे., उध्दवरण नलिका भाग अ, उध्दवरण नलिका भाग ब. | २३.३७ | २३.३७ | |
| ७. | हरित वृक्षाची लागवड करणे. पूर्व बाजू, पश्चिम बाजू, उत्तर बाजू, दक्षिण बाजू व बाग-बगीचा तयार करणे. | ४५.६१ | ४५.६१ | |
| | **एकूण** | **१०१.३३** | **१०१.३३** | |

प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत रु. २५४०.०० लाख इतका निधी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ या शासन अंगीकृत उपक्रमास पर्यटन विकासासाठी शासन समक्रमांक दि. १३/०८/२००९ अन्वये वितरीत केला असून महामंडळास वितरीत केलेल्या रु. २५४०.०० लाख या निधीतून वर नमूद केलेल्या कामांस रु. १०१.३३ लाख (रुपये : एकशे एक लाख तेहतीस हजार फक्त) जिल्हाधिकारी, उस्मानाबाद यांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) महामंडळाने त्यांना वितरीत केलेल्या निधीतून जिल्हाधिकारी, उस्मानाबाद यांना निधी वितरीत करावा.

२) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

३) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हाधिकाऱ्यांवर राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

४) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च मार्च २०१० पर्यंत करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

५) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

६) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

७) उपरोक्त सर्व कामांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता, यापूर्वी घेतली नसल्यास, काम सुरु करण्यापूर्वी प्राप्त करुन घेण्यात यावी. ज्या प्रस्तावांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देताना काही अटी व शर्ती विहित करण्यात आलेल्या आहेत अशा अटीं व शर्तीची आधी पूर्तता करणे बंधनकारक राहील.

८) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

९) योजनेतर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात जिल्हाधिका-यांनी संबंधित देवस्थान संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरिता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणाऱ्या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरिकांसाठी खुले राहील अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

११) सदर निधीतून होणाऱ्या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यात शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

१२) सदर काम पूर्ण झाल्यानंतर सदर स्मारकाच्या देखभालाची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची राहील.

१३) वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २००९-१० या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष **"मागणी क्रमांक झेडङ्ी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०१) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना यांना (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरिता अनुदान (३४५२ १९५ ८) ३१ सहाय्यक अनुदाने"** या लेखा शिर्षाखाली मंजुर तरतूदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या (प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत) सहाय्यक अनुदानाची रक्कम महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने, जिल्हाधिकारी, उस्मानाबाद यांना वितरीत करण्यात यावी.

१४) हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-एक, शासन निर्णय क्र. विअप्र१०.०८/प्र.क्र.७०/२००८, दि.१५ मे २००९ मधील अनु. क्र. २७ नियम क्र. १४९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारातंर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

यासाठी होणारा खर्च हा "३४५२-पर्यटन', मागणी क्र., ०१-पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजनाराज्य योजनांतर्गत योजना (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणी मुलभूत सुविधासाठी अनुदान (३४५२ १९५ ८)" या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित केलेल्या व उपलब्ध करुन दिलेल्या निधीतूनच खर्ची भागविण्यात येईल.

हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-एक, शासन निर्णय क्र. विअप्र १०-०८/प्र.क्र.७०/२००८, दि.१५ मे २००९ मधील अनु. क्र. २७ नियम क्र. १४९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारातंर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**(आ. बा. डमाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,
महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
जिल्हाधिकारी, उस्मानाबाद
जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.